अर्थसंकल्पिय अनुदान २०१८-२०१९
"२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य - महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४)"
मागणी क्रमांक वाय-२

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११७/पापु-२३**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २२ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१. **शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८**
२. **शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११७/पापु-२३, दि. १३ एप्रिल, २०१८**
३. **शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११७/पापु-२३, दि. १० ऑगस्ट, २०१८**

**प्रस्तावना:-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१८-१९ करिता ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रुपये ८,७६,५६,०००/-(अक्षरी रुपये आठ कोटी श्याहत्तर लाख छपन्न हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाने सन २०१८-२०१९ करीता सदर तरतूदीपैकी ७० % निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर तरतूदीपैकी जिल्हा परिषदांना माहे एप्रिल, २०१८ ते डिसेंबर, २०१८ या नऊ महिन्यांकरीता ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी एकूण रुपये ४,१०,५०,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी दहा लाख पन्नास हजार फक्त) इतके अनुदान वाचा मधील अनुक्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे. आता जिल्हा परिषदांचा

दिनांक १०.१.२०१९ पर्यंतचा कोषवाहीवरील वेतन खर्च विचारात घेता ज्या जिल्हा परिषदांकडील शिल्लक अनुदान पुढील दोन महिन्यांच्या वेतन खर्चासाठी लागणा-या रक्कमेपेक्षा कमी आहे, अशा जिल्हा परिषदांना उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत अतिरिक्त वेतन अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन खर्च भागविण्यासाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५ १९१४) " या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाखाली रुपये १,६७,५०,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी सदुसष्ठ लाख पन्नास हजार फक्त ) इतके अनुदान पुढीलप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | सन २०१८-१९ करीता लेखाशिर्ष २२१५१९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेले वेतन अनुदान ३६,सहायक अनुदाने (वेतन) | या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २२१५१९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेले वेतन अनुदान (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | १८००००० | रूपये अठरा लाख फक्त |
| २ | पालघर | ३००००० | रूपये तीन लाख फक्त |
| ३ | रत्नागिरी | ५१००००० | रूपये एक्कावन्न लाख फक्त |
| ४ | सातारा | १५०००० | रूपये एक लाख पन्नास हजार फक्त |
| ५ | सांगली | ५०००० | रूपये पन्नास हजार फक्त |
| ६ | कोल्हापूर | १००००० | रूपये एक लाख फक्त |
| ७ | नांदेड | ९२५०००० | रुपये ब्याण्णव लाख पन्नास हजार फक्त |
| एकूण | | १६७५०००० | रूपये एक कोटी सदुसष्ठ लाख पन्नास हजार फक्त |

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. वितरीत करण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी. शासनाद्वारे देण्यात

येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५ १९१४)" ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८१०५७११८४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2019.01.22 11:05:39 +05'30'

चेतन निकम
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर, जालना, नांदेड, अकोला
४. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर व नांदेड
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर व नांदेड
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर व नांदेड
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१०. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
११. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. निवड नस्ती कार्यासन पापु-२३